**केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा हक्क कायदा, २००९ व त्यानुषंगाने तयार करण्यात आलेल्या महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम, २०११ मधील तरतुदीनुसार विद्यार्थ्यांना वाहतुक सुविधा अनुज्ञेय करण्याकरीता वसतिस्थाने घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२५/प्र.क्र.३१/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ० ४०००३२
दिनांक:- २० फेब्रुवारी, २०२४

**वाचा-:**

१. केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा हक्क कायदा, २००९
२. महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम, २०११
३. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२४/प्र.क्र.०४/एसडी-६, दि.२३.०१.२०२४
४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप /सशि/पशि - वाहतुक सुविधा/नस्ती क्र.२०/२०२४-२५/४४०, दि.१३.०२.२०२५

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा हक्क कायदा, २००९ च्या अनुषंगाने राज्य शासनाने महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम, २०११, पारित केले असून, या नियमामधील परिशिष्ट-१, भाग-३ मधील कलम-४ पोटकलम (३) नुसार ज्या ठिकाणी पोटकलम (१) अंतर्गत खंड (क) नुसार इयत्ता पहिली ते पाचवी या इयत्तांमध्ये शिकणाऱ्या बालकांबाबत वस्ती (Habitations) नजीकच्या एक किलोमीटर एवढ्या चालत जाण्यायोग्य अंतराच्या आत तसेच खंड (ख) नुसार इयत्ता सहावी ते आठवी यामध्ये शिकणाऱ्या बालकांबाबत वस्तीनजीकच्या तीन किलोमीटर एवढ्या चालत जाण्यायोग्य अंतराच्या आत शाळा उपलब्ध नाही. अशा राज्य शासनाने किंवा स्थानिक प्राधिकरणाने ठरवून दिलेल्या लहान वस्तींमधील (Habitations) बालकांकरिता शाळेमध्ये प्राथमिक शिक्षण देण्याच्या प्रयोजनार्थ वाहतुक भत्ता/सुविधा उपलब्ध करून द्यावयाची आहे.

महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांनी, वसतिस्थाने घोषित करणेबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्यासाठी सर्व जिल्हे / महानगरपालिका यांच्याकडून शाळा व वसतिस्थाने (Habitations / Settlernents) यातील अंतराबाबतच्या प्राप्त झालेल्या माहितीच्या विश्लेषणाअंती प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक इयत्तांमध्ये शिक्षण घेणाऱ्या शहरी व ग्रामीण वसतिस्थानातील विद्यार्थ्यांना वाहतुक सुविधा / भत्ता प्रदान करण्यासाठी ग्रामीण व शहरी ३३४१ वस्तीस्थाने (Habitations) व एकूण २०४२२ विद्यार्थी संख्या निश्चित केली असून, सन २०२५-२६ या वर्षासाठी सदर वसतिस्थाने घोषीत करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा हक्क कायदा, २००९ च्या अनुषंगाने राज्य शासनाने महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम, २०११, पारित केले असून, या नियमामधील परिशिष्ट-१, भाग-३ मधील कलम-४ पोटकलम (३) नुसार ज्या ठिकाणी पोटकलम (१) अंतर्गत खंड (क) नुसार इयत्ता पहिली ते पाचवी या इयत्तांमध्ये शिकणाऱ्या बालकांबाबत वस्ती (Habitations) नजीकच्या एक किलोमीटर एवढ्या चालत जाण्यायोग्य अंतराच्या आत तसेच खंड (ख) नुसार इयत्ता सहावी ते आठवी यामध्ये शिकणाऱ्या बालकांबाबत वसतिनजीकच्या तीन किलोमीटर एवढ्या चालत जाण्यायोग्य अंतराच्या आत शाळा उपलब्ध नाही. तसेच, ५ कि.मी. च्या अंतराच्या आत माध्यमिक वर्गात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी शाळा उपलब्ध नाही, अशा राज्य शासनाने किंवा स्थानिक प्राधिकरणाने ठरवून दिलेल्या लहान वस्तीमधील (Habitations) बालकांकरिता शाळेमध्ये प्राथमिक शिक्षण देण्याच्या प्रयोजनार्थ वाहतुक भत्ता उपलब्ध करून देण्यासाठी राज्यातील ग्रामीण व शहरी क्षेत्रातील एकूण ३३४१ वसतिस्थाने (Habitations) व एकूण २०४२२ विद्यार्थी संख्या सोबत जोडलेल्या Annexure-A, Annexure- B व Annexure- C मध्ये नमूद केल्यानुसार सन २०२५-२६ या वर्षासाठी पात्र ठरविण्यात आली आहेत.

२. इयत्ता १ ली ते ५ वी च्या विद्यार्थ्याच्या वसतिस्थानाच्या (निवासस्थान) १ कि.मी. च्या परिसरात, इ. ६ वी ते इ.८ वी च्या विद्यार्थ्यांच्या वसतिस्थानाच्या ३ कि.मी. च्या परिसरात व इ. ९ वी व इ.१० वी च्या विद्यार्थ्यांच्या वसतिस्थानाच्या ५ कि.मी. च्या परिसरात शाळा उपलब्ध नसल्यामुळे विद्यार्थ्यांना शाळेत जाता यावे, यास्तव विद्यार्थ्यांना वाहतुक भत्ता देण्यासाठी सन २०२५-२६ या वर्षासाठी सदरची वस्तीस्थाने घोषित करण्यात येत आहेत.

३. सदर योजनेतील लाभार्थ्यांना वितरीत करावयाची अनुज्ञेय रक्कम ही लाभार्थ्यांच्या बँक खात्यात थेट (DBT) जमा करण्यात यावी.

४. या शासन निणर्यामुळे कोणतीही शाळा बंद केली जाणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२२०१४४७०८३८२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e891811 8634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F 7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.02.20 14:47:44 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा उपमुख्यमंत्री (वित्त)/ (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. सभापती विधानपरिषद,/ मा. मुंबई, अध्यक्ष विधानसभा, विधानभवन, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, मुंबई,
६. मा. मुंबई, मंत्रालय, यांचे खाजगी सचिव (शालेय शिक्षण) मंत्री.
७. मा मंत्री (सर्व) यांचे यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य. पुणे,
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
११. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद. मुंबई,
१२. जिल्हाधिकारी सर्व,
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व.
१४. शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१६. शिक्षण संचालक (योजना), पुणे
१७. संचालक, पाठ्य पुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१८. अध्यक्ष, राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे,
१९. सहसंचालक, (प्रशासन), शिक्षण आयुक्तालय,पुणे,
२०. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
२१. शिक्षण सहायक संचालक (सर्व)
२२. गटविकास अधिकारी (पंचायत समिती) (सर्व)
२३. मुख्याधिकारी, नगरपालिका, सर्व
२४. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना), जिल्हा परिषद (सर्व)
२५. गटशिक्षणाधिकारी (सर्व)
२६. विस्तार अधिकारी (शिक्षण) (सर्व)
२७. उपशिक्षणाधिकारी (सर्व)
२८. शिक्षण निरीक्षक (सर्व)
२९. प्राचार्य जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, (सर्व)
३०. प्रशासन अधिकारी, महानगरपालिका (सर्व)
३१. निवड नस्ती (कार्यासन-एसडी-६).